**मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुषंगाने महसूली अधिकारी व प्राधिकारी यांच्या समोर जमीन विषयक अधिनियमाखाली चालणाऱ्या अर्ध-न्यायिक प्रकरणांच्या संदर्भातील स्थगिती आदेशाच्या बाबतीत मार्गदर्शनात्मक दिशानिर्देश ...**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२१/ प्र.क्र.१५/ज-१अ,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक:- ०१ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ :-** शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२१/ प्र.क्र.१५/ज१अ, दि.०६ मे,२०२१

**शासन परिपत्रक:-**

सर्वोच्च न्यायालयातील संकीर्ण याचिका क्र.१५७७/सी.एफ २०२० (क्रिमिनल अपिल क्र.१३७५-७६/२०१३), दि. १५/१०/२०२० च्या आदेशानुसार "मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशानुषंगाने महसूली अधिकारी व प्राधिकारी यांच्या समोर जमीन विषयक अधिनियमाखाली चालणाऱ्या अर्ध-न्यायिक प्रकरणांच्या संदर्भातील स्थगिती आदेशाच्या बाबतीत मार्गदर्शनात्मक दिशानिर्देश" या विषयावर शासन परिपत्रक क्र. संकीर्ण २०२१/ प्र.क्र.१५/ ज- १अ, दि ०६,मे २०२१ अन्वये निर्गमित करण्यात आले होते. उपरोक्त परिपत्रकान्वये सर्व संबंधित महसूली अधिकारी व प्राधिकारी यांना पुढीलप्रमाणे दिशानिर्देश देण्यात आले होते.

(१) मा.मंत्री (महसूल), मा.राज्यमंत्री (महसूल), प्रधान सचिव (अ.व.रि.), क्षेत्रीय महसूली अधिकारी व प्राधिकारी आणि महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरण यांच्या समोर चालणा-या अर्ध-न्यायिक (Quasi-Judicial)/ न्यायिक प्रकरणी ६ महिन्यांपेक्षा जास्त काळाकरीता स्थगिती दिलेल्या सर्व प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाने MISCELLANEOUS APPLICATION NO.१५७७ CF २०२० IN CRIMINAL APPEAL NOS.१३७५-७६ OF २०१३ या प्रकरणात दि.१५ ऑक्टोबर, २०२० रोजी दिलेल्या आदेशाप्रमाणे, सर्व संबंधितांनी योग्य ती कार्यवाही करावी कोणत्याही परिस्थितीत मा. सर्वोच्च न्यायालयाच्या आदेशाचा अवमान होणार नाही, याचीही दक्षता घ्यावी.

(२) उक्त नमूद कोणत्याही महसुली न्यायालयाने आणि महाराष्ट्र महसूल न्यायाधिकरणाने दिलेली अंतरिम स्थगितीची कालमर्यादा फक्त ६ महिन्यांपर्यंत लागू राहील. महसुली न्यायालयाने सबळ कारणांच्या आधारे, अपवादात्मक परिस्थितीत अशी स्थगिती ६ महिन्यानंतर वाढविली असेल, तरच तत्पुर्वी दिलेली स्थगिती चालू राहील, अन्यथा सदरहु स्थगिती ६ महिन्याचा कालावधी संपल्यानंतर आपोआप व्यपगत होईल. तसेच, हे आदेश संपूर्ण राज्यातील कोणत्याही महसुली अथवा अन्य न्यायालयाने दिलेल्या सर्व स्थगिती आदेशाला लागू राहतील.

०२. तथापि, मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र. ९७२०/२०२४ श्रीमती. ताराबाई लेंडघर व इतर याप्रकरणी दि.१९/०७/२०२४ रोजीच्या आदेशान्वये विचाराधीन दि.०६/०५/२०२१ रोजीचे परिपत्रकामध्ये नमूद Asian Resurfacing of Road Agency Pvt. Ltd. V. C. B. I. (२०१८) १६ SCC २९९ यातील तरतूदी या फक्त दिवाणी व फौजदारी खटल्यातील प्रकरणांनाच लागू राहतील, असे स्पष्ट केले आहे. सदर आदेश पुढीलप्रमाणे आहे.

*"He also relies upon **Devsingh Ramchandra Chavan Vs. State of Maharashtra & Ors २०२२ (५) Mh.LJ. १३८**, in which it has been held that **Asian Resurfacing of Road Agency Pvt. Ltd V. C.B.I.** (supra) would operate only qua the civil and criminal cases pending in trial and not to any other category of orders passed in proceedings."*

०३. मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी रिट याचिका क्र. ९७२०/२०२४ श्रीमती. ताराबाई लेंडघर व इतर याप्रकरणी दि. १९/०७/२०२४ रोजीचे आदेश विचारात घेता महसूल व वन विभाग, शासन परिपत्रक क्र. २०२१/प्र.क्र.१५/ ज-१अ, दि. ०६/०५/२०२१ हे रद्द करण्यात येत आहे.

०४. सर्व विभागीय आयुक्त, जिल्हाधिकारी व क्षेत्रीय महसूली प्राधिकारी व अधिकारी यांनी उपरोक्त तरतूदीची नोंद घ्यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२४०८०११४५९१०९८१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANJUSHA DATTATRAY SONJE

Digitally signed by MANJUSHA DATTATRAY SONJE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=8e491e40da312b87356d474f3637bdb55dff1aa207b1723030265ad04926cadb, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=14ABD3DD33A977D709D803B6057EB9FE0DE69BD4ACD4BF7CA36CED00F53EA72C, cn=MANJUSHA DATTATRAY SONJE
Date: 2024.08.01 15:15:17 +05'30'

**( मंजुषा सोनजे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई
४) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६) अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७) प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
८) अप्पर मुख्य सचिव (महसूल, मुद्रांक शुल्क व नोंदणी), यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
१०) महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र१/२, मुंबई/ नागपूर
११) जमाबंदी आयुक्त आणि संचालक भूमी अभिलेख,
१२) नोंदणी महानिरिक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई
१४) सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभाग
१५) सर्व विभागीय आयुक्त
१६) सर्व जिल्हाधिकारी
१७) सर्व सह सचिव/ उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१८) सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
१९) सह सचिव (ज-१), यांचे स्वीय सहायक, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
२०) निवड नस्ती (ज-१)